महाराष्ट्र विकास सेवा गट अ मधील अधिका-यांना निवडश्रेणी वेतनश्रेणीचे सुधारीत दिनांक मंजूर करण्याबाबत. . .

---

**महाराष्ट्र शासन**

ग्रामविकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय क्र.मविसे १०/२०१०/प्र.क्र.४७/आस्था-३,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ४ जुलै, २०११

संदर्भ : १) शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०९८/प्र.क्र.२७२६/१०, दिनांक २१.४.९९

२) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०९९/ प्र.क्र.२९४५/१०, दिनांक १३.१०.९९

३) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०९८/ प्र.क्र.२७२६/१०, दिनांक १९.११.९९

४) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०९८/ प्र.क्र.२७२६/१०, दिनांक ७.१.२०००

५) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०९८/ प्र.क्र.२७२६/१०, दिनांक २४.४.२०००

६) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०९८/ प्र.क्र.२७२६/१०, दिनांक २५.४.२०००

७) शासन शुध्दिपत्रक, ग्राम विकास व जल संधारण विभाग क्र.मविसे १०९८/प्र.क्र.२७२६/ १०, दि.२५.४.२००० (श्री.एस.टी.मेश्राम, श्री.आर.एस.मोहोड,श्री.ए.बी.लांडगे यांच्या संदर्भातील )

८) शासन शुध्दिपत्रक, ग्राम विकास व जल संधारण विभाग क्र.मविसे १०९९/ प्र.क्र.२९४५/ १०, दि.२५.४.२००० (श्री.व्ही.एस.बरडे, श्री.सी.बी.आवळे, श्री.आर.एन.शेरखाने यांच्या संदर्भातील)

९) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००० प्र.क्र.३२८८/१०, दिनांक ३०.६.२०००

१०) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००० प्र.क्र.३२८८/१०, दिनांक १७.१०.२०००

११) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००० प्र.क्र.३२८८/१०, दिनांक ३१.३.२००१

१२) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००२/ प्र.क्र.४११७/ आस्था-३, दिनांक २१.१०.२००२

१३) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००६/ प्र.क्र.८७/आस्था-३, दिनांक ९.८.२००६

१४) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००६/ प्र.क्र.८७/आस्था-३, दिनांक १४.३.२००७

१५) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००६/ प्र.क्र.८७/आस्था-३, दिनांक २.०३.२०१०

१६) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२०१०/ प्र.क्र.४७/आस्था-३, दिनांक १४.७.२०१०

१७)शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२०१०/ प्र.क्र.४७/आस्था-३, दिनांक ५.८.२०१०

**प्रस्तावना :-**

श्री.एस.एम.केंद्रेकर व इतर उपमुख्य कार्यकारी अधिकारी, गट विकास अधिकारी (उच्चश्रेणी) यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद येथे मुळ अर्ज क्र.२५३/२००० व २५४/२००० दाखल करुन महाराष्ट्र विकास सेवेतील अधिका-यांची जेष्ठता निश्चित करतांना सेवाप्रवेश नियमातील नियुक्तीच्या प्रमाणानुसार पदे राखून ठेवण्याबाबत व त्यानुसार सेवाजेष्ठता निश्चित करण्याची मागणी केली होती. सदर अर्जावर सुनावणी होऊन सन्माननीय न्यायाधिकरणाने दिनांक २२.११.२००२ रोजी सेवाप्रवेश नियमातील तरतूदीप्रमाणे ठरवून दिलेल्या नियुक्तीच्या प्रमाणानुसार उपलब्ध जागांवर प्रत्येक वर्षनिहाय नियुक्ती दर्शविण्यात यावी तसेच पदसंख्येचा विचार करतांना जी पदे तीन वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी अखंड चालू राहिली आहेत, ती पदे सुध्दा सेवाजेष्ठतेसाठी विचारात घेण्यात यावीत आणि सेवाजेष्ठता गमावलेल्या परंतु अगोदरच पदोन्नती दिलेल्या अधिका-यांच्या पदोन्नत्या अबाधित ठरविण्यात याव्यात, असा निर्णय दिला. तद्नंतर शासनाने सन्माननीय न्यायाधिकरणाचे मूळ अर्ज क्रमांक २५३/२००० व २५४/२००० वरील दिनांक २२.११.२००२ चे आदेश व तद्नंतर त्यासंदर्भात दाखल झालेल्या अवमान याचिका क्र.८९/२००३ आणि उच्च न्यायालय, औरंगाबाद येथे दाखल झालेल्या विविध रिट याचिका क्र.२४६६/२००५, ८२५६/२००५, ५१३०/२००५, ४०२३/२००७ यामधील आदेश/निर्देश विचारात घेऊन सेवाजेष्ठता अंतिमत: दिनांक २१.११.२००५ च्या परिपत्रकान्वये प्रसिध्द केली. त्यानुसार पुढील कार्यवाही होत आहे. तथापि उच्च न्यायालयात वर नमूद केलेल्या रिट याचिका अद्यापही प्रलंबित आहेत. याप्रमाणे प्रसिध्द केलेल्या जेष्ठता यादीनुसार वर संदर्भामध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयांपैकी अनुक्रमांक १ ते १२ मधील शासन निर्णयान्वये ज्या अधिका-यांना निवडश्रेणी वेतनश्रेणी मंजूर करण्यात आलेली आहे, त्यातील काही अधिका-यांनी जेष्ठता गमावल्यामुळे अशा अधिका-यांना मंजूर केलेल्या निवडश्रेणी वेतनश्रेणी शासन आदेश, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र.मविसे १०/२००६/प्र.क्र.८७ (ब)/आस्था-३, दिनांक ८ ऑगस्ट,२००६ च्या आदेशान्वये काढून घेण्यात आलेल्या आहेत. त्यामुळे निवडश्रेणी पदावरील नेमणूकीचे सुधारीत दिनांक मंजूर करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भाधीन क्र.१६ आणि १७ अन्वये महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अधिकाऱ्यांना निवडश्रेणी वेतनश्रेणीचे सुधारित दिनांक मंजूर करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

श्री. डी.एस.पाटील यांना संदर्भाधीन क्र.९ च्या शासन निर्णयान्वये निवडश्रेणी वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे. श्री.डी.एस.पाटील यांच्याबाबत शासन ज्ञापन क्र.मविसे-६२०८/प्र.क्र.८०/आस्था-२, दिनांक १५.७.२०१० अन्वये ठेवण्यात आलेल्या दोषारोपांच्या अनुषंगाने चालू असलेल्या विभागीय चौकशी प्रकरणातील आरोप विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २.४.१९७६ आणि दिनांक २२.४.१९९६ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार विभागीय चौकशी अंती शिक्षा झाल्यास ती पदोन्नतीच्या पदावर भोगण्याची तयारी असल्याचे बंधपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून दिनांक १.४.१९९९ हा सुधारीत निवडश्रेणी वेतनश्रेणीचा दिनांक मंजूर करण्याचा जाणीवपूर्वक निर्णय घेण्यात आला आहे.

त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २२.४.१९९६ च्या शासन परिपत्रकातील तरतूदीनुसार श्री. पाटील यांनी विभागीय चौकशी अंती शिक्षा झाल्यास ती पदोन्नतीच्या पदावर भोगण्यास तयार असल्याचे बंधपत्र दिनांक १.७.२०११ रोजी शासनास सादर केले असल्याने, सदर बंधपत्रातील अटींच्या अधीन राहून आता या शासन निर्णयान्वये श्री. डी.एस. पाटील यांना दिनांक १.४.१९९९ हा निवडश्रेणी वेतनश्रेणीचा सुधारीत दिनांक मंजूर करण्यात येत आहे.

५. वर नमूद केल्याप्रमाणे श्री.पाटील यांना निवडश्रेणी वेतनश्रेणीचा सुधारीत दिनांक मंजूर करण्यात येत असला तरी तो फक्त वेतननिश्चिती करण्यासाठी अनुज्ञेय राहतील. तथापि त्यामुळे येणा-या वेतनाच्या फरकाची रक्कम त्यांना अनुज्ञेय राहणार नाही.

६. याप्रमाणे मंजूर करण्यात येत असलेला निवडश्रेणी वेतनश्रेणीचा सुधारीत दिनांक हा उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्र.२१७८/२००३, २०५५/२००३, ३४६९/२००३, ४७११/२००४ व २४६६/२००५ तसेच ८२५६/२००५, ५१३०/२००५, ४०२३/२००७ व आरक्षणासंदर्भात मा.उच्च न्यायालयात दाखल झालेल्या याचिका क्र.८४५२/२००४, ३७९/२००५, ४७०/२००५ व ४७२/२००५ यावरील सन्माननीय उच्च्य न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहेत.

७. सदर आदेश सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग (पहा सा.प्र.वि.चा अनौपचारिक संदर्भ क्र. २०९/१६ ब दिनांक १० मार्च,२०१० आणि अनौपचारिक संदर्भ क्र.५७३/१२, दिनांक २२ एप्रिल,२०१० व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२२१/१०/सेवा-३, दिनांक १०.५.२०१०) यांच्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०७०४१६५११३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सरिता बांदेकर-देशमुख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३. सर्व जिल्हा परिषदांचे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी
४. सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा
५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
६. महालेखापाल-१, लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल-१, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल-२, लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल-२ लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०.सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. श्री. डी.एस.पाटील (संबधित जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत)
१३.मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
१६. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
१७.अवर सचिव (आस्था-३), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (निवड नस्ती)